नायब तहसिलदार (गट-ब) उमेदवारांची परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरीता १३१ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१५ /प्र.क्र.५५/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (मुख्य इमारत), मुंबई- ४०० ०३२.
तारीख: २१ ऑगस्ट, २०१५.

**वाचा:-**

१. सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टिआरएन-०२१५/प्र.क्र. १८/१५/१८-ब, दि. २५/०२/२०१५.
२. अपर मुख्य सचिव ( सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांचे अ. शा पत्र क्र. टिआरएन ०२१५ /प्र.क्र.२०/१५/१८-ब, दि. २७/०३/२०१५.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि २०१२/प्र.क्र. ६६/१२/वित्तीय सुधारणा -१, दि. ११/०७/२०१२.
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०१४/ प्र.क्र ९९/१४/१२-अ, दि. ०९/०५/२०१४.
५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-०५१४/ प्र.क्र १८/१८-ब, दि. ०८/०८/२०१४.
६. सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टिआरएन-०३१५/प्र.क्र. ३५/१५/१८-ब, दि.०८/०४/२०१५.
७. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०१५/ प्र.क्र ४६/१४/१८-ब, दि. १७/०४/२०१५.
८. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र. १९७(२)/ई-९, दि. २९ जुलै, २०१५.

**प्रस्तावना:-**

राज्य सेवा परीक्षा- २०१४ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने नायब तहसिलदार “गट ब” संवर्गातील -२२८ उमेदवारांची शिफारस केली आहे. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि २०१२/प्र.क्र. ६६/१२/वित्तीय सुधारणा -१, दि. ११/०७/२०१२ व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०१५/प्र.क्र.४६/१४/१८-ब, दि. १७/०४/२०१५ अन्वये सन २०१४ पासून महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे प्रतिवर्षी सरळ सेवेने नियुक्त होणाऱ्या "गट-ब" मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येत

आहे. त्या अनुषंगाने नायब तहसिलदार “गट-ब” या संवर्गातील अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्यसेवा परीक्षा-२०१४ अंतर्गत शिफारस केलेल्या नायब तहसिलदार “गट-ब” संवर्गात नियुक्त करावयाच्या परिविक्षाधीन अधिका-यांकरीता रुपये ९३००-३४८०० (ग्रेड पे रु. ४३००/-) या वेतनश्रेणीतील नायब तहसीलदार (गट-ब) या संवर्गात १३१ अधिसंख्य पदे दि. ०२/०५/२०१५ पासून दि. १८/०३/२०१७ या कालावधीकरीता निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. सदर १३१ अधिसंख्य पदे दि. ०२/०५/२०१५ ते दि. १८/१०/२०१५ या कालावधीकरीता विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत आणि दि. १९/१०/२०१५ ते दि. १८/०३/२०१७ या प्रशिक्षण कालावधीकरीता नायब तहसिलदार प्रशिक्षणार्थी उमेदवारांचे विभागवार वाटपाबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात येणार आहे. त्या कालावधीत सदर शासन निर्णयानुसार संबंधित विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवर सदरहू अधिसंख्य पदे निर्माण होतील.

३. संदर्भाधीन क्र. १ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २५/०२/२०१५ च्या पत्रात निर्देशित केल्यानुसार संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम दिनांक ०२/०५/२०१५ पासून वनामती, नागपूर येथे सुरु झाले आहे. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०१५/प्र.क्र.४६/१४/१८-ब, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये परिविक्षाधीन अधिकारी तांत्रिक प्रशिक्षणासाठी संबंधित विभागाकडे रुजू झाल्यानंतर त्यांना विभागामार्फत नियमित वेतन अदा करण्यात येईल. तसेच आधीच्या कालावधीत अदा केलेले ठोक वेतन आणि नियमित वेतन यातील फरकाची रक्कम देखील एक रकमी तात्काळ अदा करण्यात यावी.

४. सदर प्रशिक्षण दिनांक २ मे, २०१५ पासून सुरु झाले असल्यामुळे दि. ०२/०५/२०१५ ते दि. १८/१०/२०१५ या कालावधीतील दोन तिमाहीसाठीच्या वेतनासाठी अग्रिम निधी विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांनी संचालक, वनामती, नागपूर यांना उपलब्ध करुन द्यावा.

५. परिविक्षाधीन नायब तहसिलदार यांच्या दि. ०२/०५/२०१५ ते दि. १८/१०/२०१५ या कालावधीकरीता अधिसंख्य पदांवर होणारा खर्च "मागणी क्र. सी-१, २०५३-जिल्हा प्रशासन, (००) १०१ आयुक्त, (०१) (०५) आयुक्त नागपूर ( २०५३ ०४६७ ) ०१- वेतन" या लेखाशीर्षाखालील मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच दि. १९/१०/२०१५ ते दि. १८/०३/२०१७ या प्रशिक्षण कालावधीसाठी अधिसंख्य पदांवर होणारा खर्च "मागणी क्र. सी-१, २०५३-जिल्हा प्रशासन, (००) १०१ आयुक्त, (०१) (०१) आयुक्त कोकण ( २०५३ ०३८७ )/ (०१) (०२) आयुक्त नाशिक ( २०५३ ०४०२ )/ (०१) (०३) आयुक्त पुणे ( २०५३ ०४२२ )/ (०१) (०४) आयुक्त अमरावती ( २०५३ ०४४९ )/ (०१) (०५) आयुक्त नागपूर ( २०५३ ०४६७ )/ (०१) (०६) आयुक्त औरंगाबाद ( २०५३ ०४८५ ) बाब क्र. ०१-

वेतन" या लेखाशीर्षाखालील मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा. सदर बाबीसाठी आवश्यक असल्यास अतिरिक्त रकमेसाठी सुधारीत अंदाजपत्रकात मागणी सादर करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २९५/२०१५/व्यय-९, दि. २१/०७/२०१५ व अनौ. संदर्भ क्र. २०२/विसु-१, दि. ०३/०८/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०८२०१६३९०१९९१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sambhaji Chandrakant Mondkar

Digitally signed by Sambhaji Chandrakant Mondkar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sambhaji Chandrakant Mondkar
Date: 2015.08.21 15:48:52 +05'30'

( सं. चं. मोंडकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई/ पुणे विभाग, पुणे/ नाशिक विभाग,नाशिक/ अमरावती विभाग, अमरावती/ औरंगाबाद विभाग, औरंगाबाद/ नागपूर विभाग,नागपूर.

२) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पुणे/नाशिक/अमरावती/औरंगाबाद/नागपूर.

३) प्रधान महालेखापाल- १/२(लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा ) महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.

४) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), धरमपेठ, नागपूर- ४४०००१.

५) संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ विकास प्रशासन प्रबोधिनी, अमरावती.

६) कक्ष अधिकारी, कार्यासन (व्यय-९/अर्थसंकल्प/वित्तीय सुधारणा ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

७) अवर सचिव, कार्यासन १८-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

८) उप सचिव, कार्यासन ब-१/ ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

९) निवड नस्ती, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.